राज्यातील सर्व जिल्हा परिषदांतर्गत नामनिर्देशनाच्या कोटयातील गट-क संवर्गातील रिक्त पदे भरण्याकरिता ऑनलाईन परीक्षा प्रक्रिया राबविण्याबाबत सुधारित सूचना .

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक. संकीर्ण- ५०१६/प्र.क्र -३२१/आस्था-८,
बांधकाम भवन, फोर्ट, २५- मर्झबान पथ
फोर्ट, मुंबई-४०० ००१,
दिनांक : २३ जुलै , २०१८.

वाचा:- १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-प्रानिंमं-२००७/प्र.क्र.४६/०७/१३-अ, दिनांक १९ ऑक्टोंबर, २००७.
२) शासन निर्णय क्रमांक-संकीर्ण-५०१७/प्र.क्र.३२१/आस्था-८, दिनांक-२४ ऑगस्ट,२०१७.

प्रस्तावना:-

राज्यातील सर्व जिल्हा परिषदांतर्गत नामनिर्देशनाच्या कोटयातील गट-क संवर्गातील रिक्त पदे भरण्याकरिता सामान्य प्रशासन विभागाने त्यांच्या शासन निर्णय दिनांक १९ ऑक्टोंबर, २००७ अन्वये संबंधित जिल्हयांच्या जिल्हाधिकाऱ्यांच्या अध्यक्षतेखाली एक निवड समिती गठीत केलेली आहे. सदर निवड समितीमार्फत जिल्हा स्तरावरील सर्व विभागांच्या वर्ग-३ च्या पदांची भरती केली जाते. अशा प्रकारे वर्ग-३ च्या पदांची भरती करीत असतांना परिक्षांचे पेपर तयार करणे, परिक्षा घेणे, पेपर तपासणे इत्यादी बाबींसाठी जिल्हाधिकारी, मुख्य कार्यकारी अधिकारी व इतर जिल्हास्तरीय अधिकाऱ्यांचा बऱ्याच प्रमाणात वेळ व श्रम यांचा अपव्यय होतो व त्याचा विपरित परिणाम इतर विकास कामांवर होत असल्याने राज्यातील सर्व जिल्हा परिषदांतर्गत नामनिर्देशनाच्या कोटयातील गट-क संवर्गातील रिक्त पदे भरण्याकरिता ऑनलाईन भरती प्रक्रिया राबविण्याबाबतचा निर्णय दिनांक २४ ऑगस्ट,२०१७ च्या शासन निर्णयांन्वये घेण्यात आला होता. त्यानुसार, स्थानिक जिल्हा परिषदेशी संबंधित बाबींवर काही प्रश्न या परिक्षेत

समाविष्ठ करण्याचा देखिल निर्णय घेण्यात आल्याने या परिक्षा जिल्हा परिषद निहाय स्वतंत्रपणे घेण्याचा निर्णय घेण्यात आला आहे, त्यामुळे सदर शासन निर्णय अधिक्रमीत करण्यात येत आहे. ऑनलाईन परिक्षा प्रक्रिया राबविण्याबाबत सुधारित सुचना देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. त्यानुसार ऑनलाईन परिक्षा प्रक्रिया राबविण्याबाबतच्या सुधारित सुचना खालीलप्रमाणे देण्यात येत आहेत.

<u>शासन निर्णय</u> :-

१) राज्यातील सर्व जिल्हा परिषदेमधील वर्ग-३ च्या कर्मचाऱ्यांकरिता यापूर्वी सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक १९ ऑक्टोंबर, २००७ च्या शासन निर्णयांन्वये गठीत करण्यात आलेल्या निवड समितीच्या कक्षेतुन जिल्हा परिषदेची वर्ग-३ च्या पदांची भरती वगळण्यात येत आहे.

२) जिल्हा परिषदेकडील वर्ग-३ च्या कर्मचाऱ्यांच्या भरतीसाठी घेण्यात येणारी परिक्षा ही यापुढे जिल्हा परिषदेमार्फत Online पध्दतीने घेण्यात येईल.

३) खुल्या प्रवर्गासाठी रु.५००/- व मागासवर्गीयांसाठी रु. २५०/- असे परिक्षा शुल्क आकारण्यात येईल.

४) वरील प्रमाणे निश्चित केलेले शुल्क Online पध्दतीने स्विकारले जाईल. उदा. Net Banking, Credit/Debit Card, Mahawallet and other digital payment options.

५) परिक्षेला बसू इच्छिणाऱ्या उमेदवाराला एक किंवा एकापेक्षा अधिक जिल्हा परिषदांमध्ये पदांसाठी अर्ज करता येईल. तसेच एका उमेदवाराला एका किंवा अनेक संवर्गातील पदांसाठी अर्ज करण्याची मुभा राहील परंतु प्रत्येक पदासाठी त्याला स्वतंत्र परिक्षा शुल्क आकारले जाईल.

६) निवड झालेल्या उमेदवारांना संबंधित जिल्हयाचे मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद हे नियुक्ती प्राधिकारी म्हणून नियुक्ती देतील.

७) ग्राम विकास विभागाने जाहीर केलेल्या वेळापत्रकानुसार राज्यभर पदांची परीक्षा मुख्य कार्यकारी अधिकारी यांचेमार्फत सामान्य प्रशासन विभागाच्या शासन परिपत्रक क्रमाक-प्रानिमं१२१८/प्र.क्र.२७/१३-अ,दिनांक१४ मार्च,२०१८ मधील निर्देशानुसार ऑनलाईन पध्दतीने घेण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८०७२३१५२२४७८५२० असा आहे . हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Priyadarshan S Kamble

Digitally signed by Priyadarshan S Kamble
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f18890edb030995db4323c71a3bdecddde94daa5425bbe713b2e2a5b7d6fa779, cn=Priyadarshan S Kamble
Date: 2018.07.24 12:58:58 +05'30'

( प्रि.शं.कांबळे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

विभागीय आयुक्त (सर्व)
जिल्हाधिकारी (सर्व)
उपआयुक्त (आस्थापना) (सर्व)
मुख्य कार्यकारी अधिकारी ,जिल्हा परिषद (सर्व)
उपमुख्य कार्यकारी अधिकारी ,जिल्हा परिषद (सर्व)
सामान्य प्रशासन विभाग ( कार्यासन १३-अ ) ,मंत्रालय मुंबई-३२
निवड नस्ती (आस्था-८)